201408271624001308

तंत्र शिक्षण संचालनालयातील आढाव्यानंतरची सर्व शिक्षकीय पदे कंत्राटी पध्दतीने १००% भरण्यास परवानगी देण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्र. संकिर्ण-१००२ (५५३/२००२) आस्था-१,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १९ ऑगस्ट, २००३.

वाचा :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. बैठक-१००२ (११/२००२) आस्था-१, दिनांक २५.७.२००२.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. बैठक-१००२ (५५३/२००२) आस्था-१, दिनांक १९.७.२००३.
३) शासन पूरकपत्र, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. बैठक-१००२ (५५३/२००२) आस्था-१, दिनांक २.८.२००३.
४) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४/आस्था/२००३/१६७१, दिनांक १३.८.२००३.

शासन निर्णय :- या विभागाच्या अंतर्गत येणाऱ्या शिक्षकीय रिक्त पदांच्या २/३ पदे केवळ तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने भरण्यावर असलेली स्थगिती संदर्भित दिनांक १९.७.२००३ च्या शासन निर्णयान्वये उठविण्यात आली आहे. तंत्र शिक्षण संचालनालयांतर्गत पदांचा आढावा पूर्ण झाला असल्यामुळे या संचालनालयांतर्गत असलेली अधिव्याख्यात्यांची रिक्त पदे, २/३ ऐवजी १००% भरण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या पदांचा तपशिल सोबत जोडलेल्या विवरणपत्रात नमूद करण्यात आला आहे. या पदाव्यतिरिक्त कोणतीही रिक्त पदे भरता येणार नाहीत. ही सर्व पदे भरताना शासन निर्णय, दिनांक २५.७.२००२ व दिनांक १९.७.२००३ मध्ये विहित केलेल्या सर्व अटी लागू राहतील.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक असंक १००१/प्र.क्र.२१/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ अन्वये घेण्यात आलेल्या विभागातील शिक्षकीय पदांच्या आढाव्यास दिनांक ९.१२.२००२ रोजी झालेल्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या १७व्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक टीईडी-८००१ (३२१/०१-भाग-३)/तांशि-५, दिनांक १७.१.२००३ नुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( प्रा. वि. निकम )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

(कृपया मागे पहा.)